GR-200407291116150011-1100

**सामुहिक प्रोत्साहन योजना १९९३**
विदर्भ/मराठवाड्याकरिता खास सवलती देय करण्याबाबत
नवीन मध्यम/मोठ्या उद्योग घटकांना विशेष भांडवली
अनुदान देय करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्रमांक - आयडीएल-१०९६/(१३२५१)/उ-८,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १२ मार्च, १९९७

वाचा : १) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०९३/(८८८९)/उद्योग-८, दिनांक ७ मे, १९९३.

२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०९३/(९३७८)/उद्योग-८, दिनांक ६ जुलै, १९९४..

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०९५/(१००९२)/उद्योग-८, दिनांक ३ जानेवारी, १९९६.

प्रस्तावना :-

राज्यातील विदर्भ व मराठवाडा विभाग औद्योगिक दृष्टया मागासलेला विभाग असल्या कारणाने विदर्भ व मराठवाडा विभागात औद्योगिक प्रकल्प आकर्षित होण्यासाठी विविध प्रोत्साहन देय करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :

शासन आदेश देत आहे की, सामुहिक प्रोत्साहन योजना, १९९३ च्या तरतूदींत खालील सुधारणा करण्यात यावी :—

(अ) परिच्छेद ३.८ (१)(१)(अ) ऐवजी खालील परिच्छेद वाचावा.

(अ) फक्त संबंधीत वित्तीय संस्थेने निर्धारित केलेल्या प्रकल्पाचे अनुसार व अभिकर्त्याने स्विकारलेल्या प्रकल्प योजनेनुसार जी नवीन स्थिरमत्ता आद्यप्रवर्तक नसलेल्या उद्योगाने सर्व अंतिम परिणामकारक टप्पे पूर्ण झाल्यापासून २ वर्षात किंवा आद्यप्रवर्तक उद्योगाने ३ वर्षात संपादित केली असेल त्याच्या प्रमाणात विशेष भांडवली अनुदान तसेच प्रमाणानुसारचे व पात्र कालावधीसाठीचे विक्रीकर प्रोत्साहन विचारात घेतले जाईल.

(ब) परिच्छेद ५.२(१) ऐवजी खालील परिच्छेद वाचावा.

५.२(१) विशेष भांडवली अनुदान :

(अ) लघु उद्योग घटक :

दिनांक ७ मे, १९९३ च्या शासन निर्णय क्रमांक—आयडीएल-१०९३/(८८८९)/ उद्योग-८, मधील तरतूद चालू राहिल.

(ब) मध्यम व मोठे घटक :

विदर्भ व मराठवाडा विभागात स्थापन होणाऱ्या नवीन मध्यम व मोठया उद्योग घटकांना ग्राह्य स्थिरमत्ता गुंतवणुकीच्या १५ टक्के पर्यंत व रु.३० लाखाच्या आर्थिक मर्यादेपावेतो विशेष भांडवली अनुदान देय होईल. मात्र ही सवलत दिनांक १ एप्रिल, १९९७ अगर त्यानंतर विहित कालावधीत सिकॉम मर्यादित या अभिकर्त्याकडे वैध अर्ज सादर करणाऱ्या नवीन घटकांनाच उपलब्ध राहील.

(क) परिच्छेद ५.२(२) ऐवजी खालील परिच्छेद वाचावा.

(२) विक्रीकर सवलतीचा पर्याय :

सर्व पात्र लघु तसेच विदर्भ व मराठवाडयातील मध्यम व मोठया घटकांना (ज्यांना विशेष भांडवली अनुदान देय असेल) विशेष भांडवली अनुदाना ऐवजी दुप्पट रकमेइतके विक्रीकर प्रोत्साहन व प्रोत्साहनासाठी १ वर्षाचा अतिरिक्त पात्रता कालावधी निवडण्याचा पर्याय उपलब्ध राहील. सदर पर्याय एकदाच उपलब्ध असेल.

(ड) परिच्छेद ५.२(३) ऐवजी खालील परिच्छेद वाचावा.

(३) हे विशेष भांडवली प्रोत्साहन अनुदान रुपाने उपलब्ध असेल. सर्व पात्र लघु आणि विदर्भ व मराठवाड्यातील नवीन मध्यम व मोठे उद्योगांना सदर अनुदान अनुज्ञेय होण्यापूर्वी सर्व प्राथमिक व अंतिम परिणामकारक टप्पे पूर्ण करणे आवश्यक राहील आणि विशेष भांडवली अनुदानाची रक्कम पात्र घटकाने प्रत्यक्षात संपादन केलेल्या ग्राह्य स्थिरमत्तेच्या प्रमाणांत देय ठरेल.

वरील बदल/सुधारणा व्यतिरिक्त १९९३ योजनेच्या सर्व तरतुदी योग्य त्या अनुषंगिक बदलासह लागू राहतील.

सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक—सीआर-४९/व्यय-१६, दिनांक २९ जानेवारी, १९९७ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(मा. द. सरवणकर)
शासनाचे अवर सचिव

प्रति :

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती) यांना विनंती करण्यात येते की, या शासन निर्णयाबाबत आवश्यक ते वृत्तपत्र निवेदन देण्यात यावे, तसेच या निर्णयास पुरेशी प्रसिध्दी मिळण्याच्या दृष्टीने या शासन निर्णयातील मुद्यांना सर्व अग्रेसर वर्तमान पत्रात तसेच स्थानिक व ग्रामीण वृत्तपत्रांमध्ये (महाराष्ट्रातील) प्रसिध्दी देण्यात यावी.

प्रत : विकास आयुक्त(उद्योग), मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम, मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळ, मुंबई.
सर्व जिल्हा उद्योग केंद्राचे महाव्यवस्थापक.
व्यवस्थापकीय संचालक, पश्चिम महाराष्ट्र विकास महामंडळ, पुणे.
व्यवस्थापकीय संचालक, कोकण विकास महामंडळ, मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, विदर्भ विकास महामंडळ, नागपूर.
व्यवस्थापकीय संचालक, मराठवाडा विकास महामंडळ, औरंगाबाद.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ, मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
नियंत्रक, उद्योग मित्र, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी आणि उप उद्योग आयुक्त.
सर्व उद्योग सहसंचालक.
विक्रीकर आयुक्त, मुंबई.
वित्त विभाग/गृह विभाग(पर्यटन).
सर्व कक्ष अधिकारी, उद्योग, ऊर्जा आणि कामगार विभाग.
महालेखापाल-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२, महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी आणि लेखा परिक्षक अधिकारी, मुंबई.
निवड नस्ती (उद्योग-८)